**गोवंशीय पशुधनामध्ये उद्भवलेल्या विषाणूजन्य व सांसर्गिक लम्पी चर्म रोग प्रादुर्भावामुळे मृत पशुधनाच्या पशुपालकांना अर्थसहाय्य देण्याची योजना पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण - २०२३/प्र.क्र.४० /पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १८ जुलै, २०२३.**

वाचा :- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. डीआयएस - २०२२/प्र.क्र.१३७ /पदुम-४, दि.१६.०९.२०२२.

२. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. डीआयएस - २०२२/प्र.क्र.१३७ /पदुम-४, दि.१२.१०.२०२२.

३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र. राज्ययो - २०१९/ प्र.क्र.४२/ पदुम -४, दि.२७.०४.२०२३

४. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र जा. क्र. रोनि/एलएसडी/०२/ ४८२२/२०२३,पसं-१२, पुणे-६७. दि १०.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यात गोवंशीय पशुधनामध्ये उद्भवलेल्या विषाणूजन्य व सांसर्गिक लम्पी चर्मरोग प्रादुर्भावामुळे ज्या शेतकरी, पशुपालकांकडील पशुधनाचा मृत्यू झाला आहे, अशा शेतकरी, पशुपालकांना वाचा क्र १ येथील दि.१६.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाच्या राष्ट्रीय आपत्ती निवारण निधीच्या धोरणानुसार सन २०२२-२३ मध्ये अर्थसहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. उपरोक्त निर्णयान्वये अर्थसहाय्य अदा करताना लागू करण्यात आलेले अल्प भूधारक, अत्यल्प भूधारक हे निकष तसेच मृत पशुधनाच्या संख्येवरील निर्बंध वाचा क्र. २ येथील दि. १२.१०.२०२२ च्या शासन निर्णयान्वये शिथील करण्यात आले आहेत.

सन २०२३-२४ मध्ये दि ०१.०४.२०२३ नंतर देखील राज्यातील काही जिल्ह्यांमध्ये गोवंशीय पशुधनामध्ये लम्पी चर्म रोगाचा प्रादुर्भाव दिसून आलेला असून, या प्रादुर्भावामुळे गोवंशीय पशुधनाचा मृत्यू देखील झाला असल्याचे निदर्शनास आले आहे. ज्या शेतकरी, पशुपालक यांच्याकडील पशुधनाचा लम्पी चर्मरोग प्रादुर्भावामुळे मृत्यू झाला आहे, अशा शेतकरी, पशुपालक यांना दि. १६.०९.२०२२ व दि. १२.१०.२०२२ मधील तरतूदीनुसार अर्थसहाय्य अदा करण्याची योजना पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

लम्पी चर्मरोग प्रादुर्भावामुळे ज्या शेतकरी, पशुपालक यांच्याकडील गोवंशीय पशुधनाचा मृत्यु झालेला आहे, अशा शेतकरी, पशुपालक यांना वाचा क्र. १ येथील दि. १६.०९.२०२२ तसेच, वाचा क्र. २ येथील दि.१२.१०.२०२२ च्या शासन निर्णयामधील आर्थिक निकषानुसार अर्थसहाय्य अदा करण्याची योजना पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वार मान्यता देण्यात येत आहे.

सदरचे अर्थसहाय्य अदा करताना दि.१६.०९.२०२२ व दि.१२.१०.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचना / अटी-शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

सदरच्या अर्थसहाय्यावरील खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डी-४
२४०३, पशुसंवर्धन,
(०७), पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(०७) (०९), वैयक्तिक लाभार्थींना दुधाळ संकरित गायी / म्हशींचे वाटप करणे (१०० टक्के राज्य योजना) (कार्यक्रम)
संकेतांक २४०३बी९१५
३३, अर्थसहाय्य

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१८१६०१५१९३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2023.07.18 16:03:41 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त
४. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे.
६. सर्व जिल्हाधिकारी

७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८. मा. मंत्री (पशुसंवर्धन), महाराष्ट्र राज्य, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
१०.सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त,
११.सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई
१३.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या-१४३१), मंत्रालय, मुंबई
१४.महालेखापाल,महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागुपर.
१५.अवर सचिव (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१, पदुम-२ व पदुम-१६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.